विधी सल्लागार महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, मुंबई या पदाची वेतनश्रेणी श्रेणीउन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. बाहआ-२०१४/ प्र.क्र.४०/ का-९**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०२ जुलै, २०१८

वाचा- १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. बाहआ-२००८/ प्र क्र ४०/ का-९, दि. २८/०१/२००९

२) महिला व बाल विकास विभागाचे शासन निर्णय क्र. बाहआ-२०१४/ प्र क्र ४०/ का-९, दि.०२/१२/२०१७

३) प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. बाहआ-२०१८/विधी सल्लागार/ वेतनश्रेणी/२०१७-१८/२७३,दि. १७/०२/२०१८

**शासन निर्णय:-**

उपरोक्त वाचा येथे नमूद क्र. २ येथील शासन निर्णयान्वये श्री. प्रमोद माधव बाडीगी, न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई यांची महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोगाच्या विधी सल्लागार या पदावर दोन वर्षांकरीता प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे. त्यापूर्वी सदर पदावर श्री. अभिजित अरविंद नांदगांवकर, दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठस्तर), श्रीरामपूर, जि.अहमदनगर यांची शासन निर्णय दि.२०.१०.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीने दोन वर्षांच्या कालावधीकरिता नियुक्ती करण्यात आली होती. परंतु मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि. २२.०५.२०१७ च्या अधिसूचनेन्वये त्यांना पदोन्नती मिळाल्याने बाल हक्क संरक्षण आयोगाने त्यांना दि.२५.०५.२०१७ च्या आदेशान्वये कार्यमुक्त केले होते.

२. उपरोक्त वाचा येथे नमूद क्र. २ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोगाच्या प्रशासकीय कामकाजासाठी १२ पदे मंजूर आहेत. त्यानुसार विधी सल्लागार हे पद (रु.१०,००० - १५,२००) या वेतनश्रेणीत मंजुर आहे. ६ व्या वेतन आयोगानुसार सदर पदाची वेतनश्रेणी (रु. १५,६०० - ३९१००, ग्रेड पे रु.६,६००) अशी आहे. बाल हक्क संरक्षण आयोगावर शासन निर्णय दि. २०.१०.२०१६ अन्वये नियुक्ती दिलेल्या श्री. अभिजित नांदगांवकर, दिवाणी न्यायाधीश (वरीष्ठस्तर), यांची व सध्या आयोगावर कार्यरत असलेले श्री. प्रमोद माधव बाडीगी, न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई यांची मूळ वेतनश्रेणी ही मा.न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार (३९५३०-९२०-४०४५०-१०८०-४९०९०-१२३०-५४०१०) अशी आहे. त्यानुसार सदर पद या वेतनश्रेणीत श्रेणीउन्नत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आता या शासन निर्णयान्वये बाल हक्क संरक्षण आयोगाच्या विधी सल्लागार या पदाची वेतनश्रेणी (रु.३९५३०-९२०-४०४५०-१०८०-४९०९०-१२३०-५४०१०) याप्रमाणे, श्रेणी उन्नत करण्यास श्री. प्रमोद माधव बाडीगी, न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई हे सदर पदावर कार्यरत असेपर्यंत (दोन वर्ष) तसेच श्री.अभिजित अरविंद नांदगांवकर, दिवाणी न्यायाधीश (वरीष्ठस्तर) हे सदर पदावर कार्यरत असताना दि.२०.१०.२०१६ ते दि.२५.०५.२०१७ या कालावधीकरीता शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०१८०७०२१२१९४६५७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2018.07.02 14:47:42 +05'30'

**(स्मिता निवतकर)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. सचिव महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, मुंबई
६. स्वीय सहायक, सचिव/ सह सचिव/उप सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. श्री. प्रमोद माधव बाडीगी, न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई सद्या प्रतिनियुक्तीने विधी सल्लागार महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, मुंबई
८. श्री. अभिजित अरविंद नांदगांवकर, दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठस्तर), श्रीरामपूर, जि.अहमदनगर
९. प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, मुंबई
१०.वित्त विभाग (सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (का-९)